गृह (परिवहन) विभागातील मोटार वाहन निरीक्षकांच्या सर्वसाधारण बदल्या (सन २०१७)

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एमव्हीडी ०४१७/प्र.क्र.८९ /भाग-१/परि-४**
२ रा मजला, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई-४०० ०३२
तारीख : - १५ मे, २०१७.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने खालील तक्त्यात नमूद मोटार वाहन निरीक्षक संवर्गातील अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.प्रकाश मुळे | सातारा | बारामती |
| २ | श्री.संभाजी होलमुखे | पनवेल | सातारा |
| ३ | श्रीमती विंदा गुरावे | पिंपरी-चिंचवड | पुणे |

२. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक - सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दि.३० ऑगस्ट, १९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सुचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

३. संबंधीत नियंत्रक अधिकाऱ्यांनी सदर बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांस त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करुन त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तातडीने रुजू होण्यास सांगावे. तसेच या आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्याकरिता बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही परिस्थितीत दिनांक १ जुलै, २०१७ पासूनचे वेतन बदलीपूर्व कार्यालयाने काढू नये. याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत नियंत्रक अधिकाऱ्याची असेल.

४. संबंधीत अधिकाऱ्यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी विहीत कालावधीत रुजू व्हावे व पदभार स्विकारल्याचा अहवाल परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१५१४१८१४८१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Machhindranath R Shelke

Digitally signed by Machhindranath R Shelke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Machhindranath R Shelke
Date: 2017.05.15 17:44:33 +05'30'

**(म. रं. शेळके)**
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मंत्री / राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व जिल्हे)
९. प्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व )
१०. उपप्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व )
११.निवडनस्ती (परि-४)